सातारा जिल्ह्यातील सातारा तालुक्यातील प्रमुख जिल्हा मार्ग क्रमांक २६ च्या लांबी मध्ये बदल करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रवियो-२०२५/प्र.क्र.०५/नियोजन-२**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक- ०२ जून, २०२५

**पहावे :-** १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांचे पत्र क्र. मुअ(पुणे)/का-२/रेशा/२०/३९४/२०१९, दि.२१/०१/२०१९
२) शासन निर्णय क्र. रवियो-२०१९/प्र.क्र.०८/नियोजन-२, दि.११/०२/२०१९
३) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, सातारा यांचे पत्र जा.क्र.रेशा/रस्ते दर्जोन्नत/१८४८/२०२५, दि.१५/०४/२०२५.

**प्रस्तावना :-**

मुख्य अभियंता सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांनी संदर्भधिन क्र.(१) अन्वये विनंती केल्याप्रमाणे सातारा जिल्ह्यातील सातारा तालुक्यातील कास तलावाच्या भिंतीची उची वाढविल्याने सातारा-कास-बामणोली-गोगवे-तापोळा-महाबळेश्वर (प्रमुख जिल्हा मार्ग-५९) या रस्त्यामध्ये प्रमुख जिल्हा मार्ग-२६ ते कासाणी फाटा ते घाटाई देवी रस्ता ते प्रमुख जिल्हा मार्ग -२६ रस्ता (इजिमा क्र. ५९) हा ८.०० कि.मी. लांबीचा रस्ता दर्जोन्नत करुन प्रजिमा क्र. २६ मध्ये समाविष्ट करण्याबाबतचा शासन निर्णय संदर्भाधिन क्र.(२) अन्वये निर्गमित करण्यात आला आहे.

सदर शासन निर्णयामध्ये त्यावेळी घाटाई देवी फाटा,कास पुष्प पठार , कास धरण भिंत अशी एकूण ४ कि. मी. लांबी प्रजिमा २६ च्या एकूण लांबीमधून वगळणे आवश्यक होते तथापि सदरची ( घाटाई देवी फाटा,कास पुष्प पठार, कास धरण भिंत अशी एकूण ४ कि. मी.) लांबी न वगळता रस्त्याच्या मूळ लांबीमध्ये ८ कि. मी. ने वाढ होऊन एकूण १०८ / ८५० कि. मी. इतकी करण्यात आली होती.

दरम्यानच्या काळात नागरिकांची गैरसोय टाळण्यासाठी नगरपरिषद,सातारा यांचेमार्फत त्यांच्या अखत्यारीत येणाऱ्या जागेमध्ये १२०० मी. लांबीचे व १२ मी. रुंदीचे बाह्यवळण तयार करण्यात आले आहे, सदर बाह्यवळण पाण्याखाली जाणाऱ्या लांबीच्या वरील बाजूने जात आहे. नगरपरिषदेकडून ही लांबी

पर्यटनाच्या दृष्टीने महत्वाचे असलेले कास पठार येथून बामणोली, तापोळा येथे जाणेकरिता नजिकची असल्याने सा. बां . उपविभाग सातारा यांचेकडे हस्तांतरीत करण्यात आली आहे.

आता सदर्भाधिन क्र. (१) अन्वये अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, सातारा यांनी सातारा जिल्ह्यातील सातारा तालुक्यातील रा.म.मा.क्र.४ संभाजीनगर (सातारा ) जगतापवाडी, पॅरेंट्स स्कूल ते बोगदा (सातारा ) कि.मी. ५.०० लांबीचा समावेश प्रजिमा क्र. २३ मध्ये करुन घाटाईदेवी फाटा, कास पृष्ठ पठार, कास तलाव ते कास तलाव ते कास तलाव भिंत एकूण ४.०० कि.मी. लांबी प्रजिमा क्र. २६च्या लांबीमधून कमी करण्याबबाबत शासनास शिफारस केलेली आहे. तसेच नगरपिरषद, सातारा यांनी सदर रस्त्याबाबत मागणी केलेली आहे. .

सदर रस्त्यांवरील गावांची संख्या, लोकसंख्या, रस्त्यांचा होणारा वापर तसेच नगरपरिषद, सातारा यांची मागणी विचारात घेता, सदर अवर्गीकृत लांबी,अस्तित्वातील प्रमुख जिल्हा मार्ग क्रमांक- २६ मध्ये समाविष्ट करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय :-**

अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, सातारा यांचा प्रस्ताव व नगर परिषद, सातारा यांची मागणी विचारात घेऊन सातारा जिल्ह्यातील सातारा तालुक्यातील खालील अवर्गीकृत लांबी अस्तित्वातील प्रमुख जिल्हा मार्ग क्रमांक-२६ मध्ये समाविष्ट करण्यात येत आहेत.

**सातारा नगरपरिषदेच्या विकास आराखड्यामध्ये समाविष्ट असलेल्या ५.०० कि.मी. लांबीचा नागरी अवर्गीकृत रस्ता (रा.म.मा.क्र.४ संभाजीनगर (सातारा)-जगतापवाडी-पेरेंटस स्कुल-बोगदा (सातारा)) प्र.जि.मा.२६ मध्ये समावेश केलेनंतर अस्तित्वातील प्र.जि.मा.२६ रस्त्याच्या एकूण लांबीत ५.०० कि.मी. ने वाढ होईल व घाटाईदेवी फाटा, कास पृष्प पठार, कास तलाव ते कास तलाव भिंत एकूण लांबी ४.०० कि.मी. ही लांबी प्र.जि.मा.२६ च्या लांबीमधून कमी होईल.**

**तदनंतर,**

**(१) प्र.जि.मा.२६ ची एकूण लांबी होऊन (१०८/८५० + ५/०० = ११३/८५० - ४/०० = १०९.८५०) इतकी होईल. प्र.जि.मा.२६ चे नवीन नामाभिधान- रा.म.मा.क्र.४ संभाजीनगर (सातारा), जगतापवाडी, पेरेंटस स्कुल, बोगदा (सातारा), यवतेश्वर, पेट्री, घाटाई देवी, फाटा घाटाई देवी,**

**कास, बामणोली, गोगवे, तापोळा, महाबळेश्वर रस्ता प्र.जि.मा.२६ कि.मी.०/०० ते १०९/८५० असे होईल.**

**(२) घाटाईदेवी फाटा, कास पृष्प पठार, कास तलाव ते कास तलाव भिंत एकूण लांबी ४.०० कि.मी. या लांबीस ( प्र.जि.मा.२६-अ ) असे संबोधण्यात यावे.**

परिणामी रस्ते विकास योजना २००१-२०२१ मधील, सातारा जिल्ह्यातील प्रमुख जिल्हा मार्ग दर्जाच्या रस्त्यांच्या एकूण लांबीत १.०० कि.मी. ने वाढ होवून एकूण लांबी (३८०६.८०० + १.००) म्हणजेच ३८०७.८०० कि.मी. इतकी होईल.

हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यातआलेला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२५०६०२१८०१३५१०१८ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUDHIR SAKHARAM SHINGADE

Digitally signed by SUDHIR SAKHARAM SHINGADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, 2.5.4.20=3998d3eee3a3404f0a79275b649cdea380b0a258ec1af12fcce19569d859bb01, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6B3F88CB68DBE3C5FB1216B6A22AB8A5F32F92B801DFB79BC503B72D9ED58BD2, cn=SUDHIR SAKHARAM SHINGADE
Date: 2025.06.02 18:02:47 +05'30'

**( सुधीर शिंगाडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, पुणे.

२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे. (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)

३) अधीक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, सातारा. (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.)

**प्रत :-**

१) जिल्हाधिकारी, सातारा.

२) मुख्याधिरी, जिल्हा परिषद, सातारा.

३) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, सातारा.

४) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.

५) रेखाचित्र शाखा, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय.

६) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.

७) निवडनस्ती.